महाबळेश्वर तालुक्यातील ग्रामीण रूग्णालय, तळदेव व तापोळा ही दोन प्राथमिक आरोग्य केंद्रे आणि सदर दोन प्राथमिक आरोग्य केंद्रांच्या अंतर्गत येणारी १४ उपकेंद्रे चालविण्यास मुदतवाढ देणे.

**महाराष्ट्र शासन**

**सार्वजनिक आरोग्य विभाग**

**शासन निर्णय क्रमांकः संकिर्ण- २०२०/प्र.क्र.९९/आरोग्य- ४**

१० वा मजला, गोकुळदास तेजपाल रुग्णालय संकुल इमारत,
लोकमान्य टिळक मार्ग, मुंबई - ४०० ००१.
तारीख: १२ जून, २०२०.

<u>वाचा :</u>

१) शासन निर्णय, सार्वजनिक आरोग्य विभाग, क्रमांकः संकिर्ण-२०१५/प्र.क्र.१२९/आरोग्य-४, दिनांक २७ मार्च, २०१८.

२) आरोग्य सेवा आयुक्तालयाचे पत्र क्रमांक-कक्ष/संआसे:७अ-टे/१ /तळदेव तापोळा/ / मुदतवाढ /१०१३/२०२०, दिनांक २ मार्च, २०२०

३) आरोग्य सेवा आयुक्तालयाचे पत्र क्रमांक:संआसे/कक्ष ३/टे.२/ग्रारू महाबळेश्वर/ अनुदान / २४६६-६८/२०, दिनांक ५ मार्च, २०२०

**प्रस्तावना-**

ग्रामीण रूग्णालय, महाबळेश्वर, जि. सातारा आणि प्राथमिक आरोग्य केंद्र, तळदेव व प्राथमिक आरोग्य केंद्र, तापोळा या आरोग्य संस्था इंडियन रेड क्रॉस सोसायटी, पांचगणी (महाबळेश्वर), जि. सातारा संचलीत बेल-एअर रूग्णालय या संस्थेस, १ वर्षाच्या कालावधीकरीता प्रायोगिक तत्वावर चालविण्यास देण्यास उपरोक्त दिनांक २७ मार्च, २०१८ च्या शासन निर्णयान्वये मान्यता देण्यात आली होती. त्यानुसार ग्रामीण रूग्णालय, महाबळेश्वर, हे रूग्णालय दिनांक १/२/२०१९ पासून आणि प्राथमिक आरोग्य केंद्र, तळदेव व प्राथमिक आरोग्य केंद्र, तापोळा हे रूग्णालय दिनांक ७/७/२०१८ पासून सदर प्राथमिक आरोग्य केंद्रांच्या अंतर्गत असलेल्या १४ उपकेंद्रांसह, इंडियन रेड क्रॉस सोसायटी, पांचगणी (महाबळेश्वर), जि. सातारा संचलीत बेल-एअर रूग्णालय या संस्थेने चालविण्यास

घेतली होती. सदर रूग्णालयांच्या कार्यक्षेत्रामधील नागरीकांना सदर रूग्णालयाकडून उत्तम सेवा मिळत असल्याने आणि ग्रामीण रूग्णालय, महाबळेश्वर येथे सी.एस.आर. फंडातून/ देणगीच्या माध्यमातून चांगल्या दर्जाच्या आरोग्य सुविधा देण्याचा संस्थेचा मानस विचारात घेता रूग्णहित विचारात घेऊन आणि संस्थेकडून देण्यात येणारी रूग्णसेवा विचारात घेता सदर शासकीय रूग्णालये याच संस्थेस आणखी काही वर्षांसाठी चालविण्यास देण्यासाठी मुदतवाढ देण्याबाबतचा प्रस्ताव शासनाच्या विचाराधीन होता. यासंदर्भात पुढीलप्रमाणे निर्णय घेण्यात आला आहे.

## शासन निर्णय-

ग्रामीण रूग्णालय, महाबळेश्वर, जि. सातारा, प्राथमिक आरोग्य केंद्र, तळदेव व प्राथमिक आरोग्य केंद्र, तापोळा आणि तळदेव व तापोळा येथील प्राथमिक आरोग्य केंद्रांच्या अंतर्गत असलेली एकूण १४ उपकेंद्रे, इंडियन रेड क्रॉस सोसायटी, पांचगणी (महाबळेश्वर), जि. सातारा संचलीत बेल-एअर रूग्णालय या संस्थेस पुढील चार वर्षे म्हणजेच ३१/३/२०२३ पर्यंत चालविण्यास देण्यासाठी मुदतवाढ देण्यास पुढील अटी व शर्तीच्या अधीन राहून शासन मान्यता देण्यात येत आहे :-

(१) सदर रूग्णालयात केवळ वैद्यकीय सेवा व राज्य शासन पुरस्कृत आरोग्य विषयक कार्यक्रम यांची अंमलबजावणी करणे या संस्थेवर बंधनकारक राहील.

(२) राष्ट्रीय कार्यक्रम राबविण्याच्या दृष्टीने शासनाने (आरोग्य सेवा आयुक्तालयाने) तयार केलेल्या मार्गदर्शक तत्वाप्रमाणे काम करणे या संस्थेला बंधनकारक राहील.

(३) केंद्र शासनाने / राज्य शासनाने विविध स्तरावर राष्ट्रीय आरोग्य कार्यक्रम यशस्वी करण्याच्या दृष्टीने काही वार्षिक उद्दिष्टेही दिली आहेत. ती उद्दिष्टे पूर्ण करणे इंडियन रेड क्रॉस सोसायटी, पांचगणी (महाबळेश्वर), जि. सातारा संचलीत बेल-एअर रूग्णालय या संस्थेला बंधनकारक राहील.

(४) इंडियन रेड क्रॉस सोसायटी, पांचगणी (महाबळेश्वर), जि. सातारा संचलीत बेल-एअर रूग्णालय या संस्थेला प्रशासकीय व तांत्रिक मार्गदर्शन शासकीय यंत्रणेमार्फत मिळणार

आहे. त्यामुळे, या संस्थेला आवश्यक असेल तेव्हा संबंधीत शासकीय अधिकारी / पदाधिकारी भेटी देतील व मार्गदर्शन करतील. या कारणासाठी राज्य शासनाला अधिकाऱ्यांना व पदाधिकाऱ्यांना सहकार्य करणे या संस्थेस बंधनकारक राहील.

(५) आरोग्य सेवा आयुक्तालयाने आरोग्य कार्यक्रमांचा नियमित आढावा घेण्याच्या दृष्टीने काही प्रपत्रे तयार केली आहेत. त्या प्रपत्रामध्ये वेळोवेळी केलेल्या मार्गदर्शक तत्वाप्रमाणे व नियमितपणे माहिती पाठविणे, तसेच गट स्तरावर, जिल्हा स्तरावर व राज्य स्तरावर आवश्यकतेनुसार बैठकांना हजर राहणे या संस्थेवर बंधनकारक राहील. तसेच देण्यात येणाऱ्या अनुदानाचा खर्च कसा झाला याची माहिती शासनाने वेळोवेळी विहित केलेल्या पध्दतीनुसार पुरवावी लागेल व ती शासनाच्या अधिकाऱ्यांना केव्हाही तपासण्यासाठी उपलब्ध करून द्यावी लागेल. रूग्णालयावरील खर्च नियमाप्रमाणे न झाल्यास हा खर्च शासनाने मान्य न केल्यास संस्थेला दिलेले अनुदान शासनास परत करावे लागेल.

(६) संस्थेने नेमावयाच्या अधिकारी व कर्मचाऱ्यांची प्रमाणके सर्वसाधारण शासनाच्या धोरणानुसार व कर्मचाऱ्यांच्या आकृतीबंधानुसार आणि त्या पदांसाठी विहित केलेल्या अर्हतेनुसार राहतील. संस्थेला द्यावयाचे अनुदान, ग्रामीण रूग्णालय, महाबळेश्वर, जि. सातारा, प्राथमिक आरोग्य केंद्र, तळदेव व प्राथमिक आरोग्य केंद्र, तापोळा आणि तळदेव व तापोळा येथील सदर प्राथमिक आरोग्य केंद्रांच्या अंतर्गत असलेली १४ उपकेंद्रे याकरीता होणाऱ्या औषधे, उपकरणे, यंत्रसामुग्री, वेतन इत्यादीबाबींवरील खर्चा इतका किंवा संस्थेने प्रत्यक्ष केलेला खर्च, यापैकी जी रक्कम कमी असेल त्या प्रमाणात देण्यात येईल किंवा शासकीय अनुदान देण्यासाठी शासनामार्फत तयार करण्यात आलेल्या नियमानुसार देण्यात येईल.

(७) संस्थेचे अधिकारी, कर्मचारी व इतर तांत्रिक कर्मचारी यांचे प्रशिक्षण शासकीय संस्थांमध्ये करणे संस्थेवर बंधनकारक राहील. त्याशिवाय आवश्यकता वाटल्यास संस्थेस हे प्रशिक्षण

इतर स्वयंसेवी संस्थेकडून करून घेता येईल. मात्र त्यावरील खर्च अनुदानासाठी अनुज्ञेय राहणार नाही.

(८) शासनामार्फत ग्रामीण भागातील लोकांना ज्या आरोग्य सेवा मोफत देण्यात येतात. त्यावरील आंतररूग्ण व बाह्यरूग्ण सेवेसाठी रूग्णपत्रिका घेताना प्रत्येक रूग्णपत्रिकेमागे प्रचलित शासकीय दराप्रमाणे आकार घेतला जातो. इतर सेवा व उपचार मोफत दिल्या जातात. या तत्वानुसार संस्थेने सेवा देणे त्यांच्यावर बंधनकारक राहील.

(९) संस्थेला वर नमूद केल्याप्रमाणे देण्यात येणारे अनुदान हे प्रतिपूर्तीच्या स्वरूपात असल्यामुळे संस्थेचे कर्मचारी यांना पगार देणे व इतर अनुज्ञेय बाबींवरील खर्च संस्थेला प्रथमत: करणे आवश्यक राहील. हा खर्च संस्थेस त्यांच्या वार्षिक लेखा परिक्षणाच्या आधारावर वर्षअखेर अनुदान स्वरूपात देण्यात येईल. काही कारणाने एखाद्या वर्षी जास्त दिलेले अनुदान पुढील वर्षाच्या अनुदानात समायोजित करण्यात येईल किंवा ते एक रक्कमी वसूल करावयाचे शासनाने ठरविल्यास संस्थेस ते एक रक्कमी परत करणे बंधनकारक राहील.

(१०) या संस्थेकडून ज्या आरोग्य सुविधा जनतेस देण्यात येतील त्या आरोग्य सुविधांच्या बाबतीत उद्भवणारी संपूर्ण जबाबदारी संस्थेची राहील व त्यासाठी राज्य शासन कोणत्याही परिस्थितीत जबाबदार राहणार नाही.

(११) शासनाच्या निरनिराळ्या स्तरावरून देण्यात येणाऱ्या सूचनांचे पालन करणे संस्थेवर बंधनकारक राहील.

(१२) काही कारणास्तव ह्या आरोग्य संस्था चालविणे संस्थेस शक्य न झाल्यास, संस्थाने त्यासाठी शासनाला कमीत कमी तीन महिन्यांची नोटीस देऊन, इमारती व इतर सर्व मालमत्ता, उपकरणे इत्यादी, आर्थिक तपशिल यासह शासनाकडे सुपूर्द करावीत. मात्र, अशा परिस्थितीत संस्थेने नियुक्त् केलेल्या कोणत्याही अधिकारी, कर्मचारी वर्गाची

जबाबदारी शासन स्वीकारणार नाही. सदर आरोग्य संस्था चालविण्यासाठी आवश्यक असलेल्या कोणत्याही भांडवली मूळ खर्चाचा किंवा त्याच्या दुरूस्ती व देखभालीच्या कोणत्याही खर्चासाठी शासन अनुदान मंजूर करणार नाही.

(१३) प्राथमिक आरोग्य केंद्रात सकाळी व दुपारी बाह्यरूग्णसेवा पुरविण्यात याव्यात. कार्यक्षेत्रातील दुर्गम भागामध्ये लसीकरण व माता बालसंगोपनबाबतच्या सेवा, विविध राष्ट्रीय आरोग्य कार्यक्रमांशी निगडीत सेवा, अत्यावश्यक सेवा, २४ तास बाळंतपणाच्या सेवा, एकात्मिक बाल विकास कार्यक्रमांतर्गत ० ते ६ वर्षे वयोगटातील बालकांची आरोग्य तपासणी व कुपोषीत बालकांचे उपचार व व्यवस्थापनाकडे विशेष लक्ष पुरविणे, दारिद्र रेषेखालील रूग्णांना मोफत सेवा पुरविणे, विविध राष्ट्रीय आरोग्य कार्यक्रमांतर्गत रुग्णांना मोफत रूग्णसेवा पुरविणे, या सेवांपेक्षा अधिकच्या सेवा सशुल्क पुरविण्याबाबत सदर संस्था इच्छूक असल्यास त्याबाबत संस्थेने स्थानिक समुदायाशी सल्लामसलत करून निर्णय घ्यावा.

(१४) प्राथमिक आरोग्य केंद्राकरीता शासनाने निश्चित केलेल्या पदांच्या आकृतीबंधानुसार चालविण्यास द्यावयाच्या प्राथमिक आरोग्य केंद्रातील सद्य:स्थितीतील आरोग्य विभागाचे कर्मचारी कायम ठेवायचे अथवा त्या संस्थेच्या कर्मचाऱ्यांची कंत्राटी पध्दतीने नियुक्ती करावी, याबाबत संस्थेने निर्णय घ्यावा. तथापि, असे कर्मचारी आकृतीबंधानुसारच असावेत व त्यांना शासनाच्या कर्मचाऱ्यांप्रमाणेच देय वेतन देण्यात यावे.

(१५) प्रत्येक वर्षाच्या कालावधीनंतर सदर आरोग्य संस्थांबाबतच्या कार्यवाहीचे परिक्षण शासनास सादर करण्यात यावे.

(१६) सदर ग्रामीण रूग्णालय, प्राथमिक आरोग्य केंद्रे व उपकेंद्राची देखरेख व पर्यवेक्षण संबंधीत जिल्ह्याच्या जिल्हा शल्य चिकित्सक आणि जिल्हा आरोग्य अधिकाऱ्यांमार्फत करण्यात येईल. सार्वजनिक आरोग्य विभागांतर्गत राबविण्यात येणाऱ्या इतर कार्यक्रम

अधिकाऱ्यांकडून प्राथमिक आरोग्य केंद्राच्या कार्यवाहीचे पर्यवेक्षण करण्यात येईल. स्वयंसेवी संस्थेस वरिष्ठ स्तरावर वेळोवेळी अहवाल सादर करणे बंधनकारक राहील.

(१७) मनुष्यबळाचे मानधन निश्चित करतांना सदर ग्रामीण रूगणालय/ प्राथमिक आरोग्य केंद्र / उपकेंद्र येथे दिनांक ३१/३/२०१८ रोजी देय असलेल्या प्रारंभिक वेतनाशी (सर्व भत्त्यांसह) समान मानधन निश्चित करण्यात यावे.

२. या अटी व शर्ती व्यतिरिक्त शासकीय हित जोपासण्याच्या दृष्टीकोणातून प्रचलित अधिनियम/ नियम या मधील आणखी काही अटी विहित करण्याची आवश्यकता असल्यास त्यासह जिल्हा शल्य चिकित्सक/ जिल्हा आरोग्य अधिकारी यांनी संस्थेसोबत सामंजस्य करार करावा.

३. आयुक्त, आरोग्य सेवा यांनी सदर रूग्णालयांच्या कामकाजाबाबतचा अहवाल प्रत्येक वर्षी शासनास सादर करावा.

४. सदर प्रस्तावामधील ग्रामीण रूग्णालयावरील खर्च मागणी क्रमांक आर-१, २२१० वैद्यकीय सेवा व सार्वजनिक आरोग्य, ०१- नागरी आरोग्य सेवा- विषम चिकित्सा, ११०-रूग्णालये व दवाखाने, ११०(४), मुफसल रूग्णालये व दवाखाने यांना सहाय्यक अनुदाने, (०३) (०१) अध्यापनेतर रूग्णालये व दवाखाने यांना सहाय्यक अनुदान (२२१००१७३), ३१ सहाय्यक अनुदाने या लेखाशिर्षाखाली आणि प्राथमिक आरोग्य केंद्रावरील खर्च मागणी क्र. आर-१,२२१०-वैद्यकीय सेवा व सार्वजनिक आरोग्य, ०६-सार्वजनिक आरोग्य, ००१- संचालन व प्रशासन, (०१) सह संचालक, आरोग्य सेवा, पुणे , (०२)(०८) प्राथमिक आरोग्य केंद्रे (स्थानिक क्षेत्र) (अनिवार्य) (२२१०५०४१), ३१- सहाय्यक अनुदाने (वेतनेतर) या लेखाशिर्षाखाली वेळोवेळी मंजूर करण्यात येणाऱ्या तरतुदीतून भागाविण्यात यावा.

५. स्थानिक क्षेत्राशी संबंधित अनुदान सह संचालक, आरोग्य सेवा, जिल्हा स्तर ( प्राथमिक आरोग्य केंद्र/ उपकेंद्र/दवाखाने), मुंबई यांनी जिल्हा आरोग्य अधिकारी, जिल्हा परिषद सातारा यांच्याकडे उपरोक्त संस्थेला अदा करण्यासाठी वेळोवेळी हस्तांरित करावे.

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०२००६०११२३९०८१५१७ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

Digitally signed by Roshani Dinesh Kadam Patil
DN: CN = Roshani Dinesh Kadam Patil, C = IN, S = Maharashtra, O = Government Of Maharashtra, OU = Public Health Department
Date: 2020.06.12 13:55:18 +05'30'

**(रो.दि.कदम-पाटील)**
अवर सचिव, महाराष्ट्र शासन.

प्रत,

१. महालेखापाल (लेखापरिक्षा/लेखा व अनुज्ञेयता) महाराष्ट्र-१, मुंबई. महाराष्ट्र-२, नागपूर.
२. आयुक्त, आरोग्य सेवा, आरोग्य भवन, मुंबई.
३. संचालक, आरोग्य सेवा-१, आरोग्य भवन, मुंबई.
४. संचालक, आरोग्य सेवा-२, पुणे.
५. अतिरिक्त संचाल, आरोग्य सेवा (कुटुंब कल्याण,माता बालसंगोपन व शालेय आरोग्य), पुणे.
६. सह संचालक, आरोग्य सेवा, रूग्णालये ( राज्यस्तर), मुंबई.
७. सह संचालक, आरोग्य सेवा, (जिल्हास्तर), मुंबई.
८. सह संचालक, (अर्थ व प्रशासन), मुंबई.
९. उप संचालक, आरोग्य सेवा, पुणे मंडळ, पुणे.
१०.सहाय्यक संचालक, (लेखा व लेखापरिक्षा), आरोग्य सेवा, पुणे.
११.जिल्हा आरोग्य अधिकारी, जिल्हा परिषद, सातारा.
१२.जिल्हा कोषागार अधिकारी, सातारा.
१३.बेल एअर हॉस्पिटल, पाचगणी, जिल्हा सातारा.
१४.अवर सचिव, अर्थसंकल्प, सार्वजनिक आरोग्य विभाग, मुंबई.
१५.निवडनस्ती, आरोग्य-४, सार्वजनिक आरोग्य विभाग.